ग्राहक संरक्षण अधिनियम, २०१९
अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग,
मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार
सोपविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : ग्रासंअ-२०२१/प्र.क्र.३३/ग्रा.सं.४**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १० नोव्हेंबर, २०२१

वाचा : (१) शासन अधिसूचना क्रमांक : ग्रासंअ-२०२१/प्र.क्र.३३/ग्रासं-४, दि. १० नोव्हेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

श्री.पी.आर.बोरा, उच्च न्यायालय, मुंबई (सेवानिवृत्त न्यायाधीश) यांची अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग या पदावर शासन अधिसूचना दि.०४ जून, २०२१ अन्वये, पदावर रुजू होण्याच्या दिनांकापासून ते त्यांच्या वयाची ६५ वर्षे होईपर्यंत म्हणजे दि.२१ ऑक्टोबर, २०२२ पर्यंत नियुक्ती करण्यात आली होती. तथापि, श्री. पी.आर. बोरा यांनी अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग या पदाचा राजीनामा दिला असून तो शासन अधिसूचना दिनांक १० नोव्हेंबर, २०२१ अन्वये मान्य करण्यात आला आहे. सबब, रिक्त झालेल्या अध्यक्ष, राज्य आयोग या पदाचा अतिरिक्त कार्यभार कार्यरत असलेल्या वरिष्ठतम सदस्याकडे सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन आदेश:-**

डॉ.संतोष काकडे, गैर-न्यायिक सदस्य, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचेकडे अध्यक्ष , राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत सोपविण्यात येत आहे.

२. उक्त शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११११०१७२६३९४२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhir Deodatta Tungar

Digitally signed by Sudhir Deodatta Tungar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b555e4e3006da7480655b52484794686f18de73c0aa909267b188c86a755c75, pseudonym=5E1F07FF6933630D1833271F4B68D3392A0A1127, serialNumber=204E151470E2D21694C51F66F9B5A8FAAE544D15F6BFA4851335010591835680, cn=Sudhir Deodatta Tungar
Date: 2021.11.11 12:41:29 +05'30'

**( सुधीर तुंगार )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३) मा.मंत्री अ.ना.पु. व ग्रा.सं. यांचे खाजगी सचिव.
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद.
५) मा.राज्यमंत्री अ.ना.पु.व ग्रा.सं. यांचे खाजगी सचिव.

६) मा.अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
७) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक.
९) अ.मु.स.(वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक.
१०) सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर.
१२) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
१३) प्रबंधक (प्रशासन/विधी) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
१४) संबंधित  जिल्हा कोषागार कार्यालय.
१५) संबंधित नियुक्त सदस्यांना राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई मार्फत.
१६) निवडनस्ती, ग्रासं-४.